**डॉ.एम.बी.इंगळे, सहायक प्रकल्प अधिकारी,**
**जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, गोंदिया**
**यांच्या सुधारीत पदस्थापनेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक आकृवि-१०१०/प्रक्र-४५१/१५ए**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ८ फेब्रुवारी, २०११.**

**संदर्भ :-१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.आकृवि १२१०/ प्र.क्र.१७८/१५अे, दि.१/७/२०१०.**
**२) महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांचे मुळ अर्ज क्र.४५९/२०१० मधील दि.७/७/२०१० चे आदेश**
**३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.अईएक्स(१)/स.प्र.का./वर्ग्-१/आस्था-१/२०१०/१२०३, दि.४/११/२०१०.**
**४) डॉ.इंगळे यांचा अर्ज दि.१५/११/२०१०.**
**५) कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र. आकृवि-१२११/प्रक्र २१/१५ए, दि.११/०१/२०११**

**शासन आदेश**

डॉ.एम.बी.इंगळे , सहायक प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, गोंदिया ( म.कृ.से.गट-अ ) यांची सार्वत्रिक बदल्यांमध्ये संदर्भ क्र.१ च्या आदेशान्वये उप विभागीय कृषि अधिकारी, पांढरकवडा जि.यवतमाळ या पदावर बदलीने पदस्थापना करुन सदर पदावरील अधिकारी श्री.जे.आर.राठोड यांची कृषि उप संचालक, जि.अ.कृ.अ.वर्धा या पदावर बदली करण्यात आली आहे. सदर बदली आदेशास श्री.राठोड यांनी मॅट, नागपूर येथे मुळ अर्ज दाखल करुन **जैसे-थे (Status Quo)** स्थिती ठेवण्याचे आदेश मिळविले आहेत. सदर मुळ अर्ज अद्यापही अंतिम निर्णयाविना प्रलंबित आहे.

डॉ.एम.बी.इंगळे हे संदर्भिय बदली आदेशानुसार दि.६/७/२०१० रोजी सहाय्यक प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, गोंदिंया येथुन कार्यमुक्त होवुन बदलीच्या पदावर हजर होण्यासाठी गेले असता न्यायाधिकरणाच्या Status Quo च्या आदेशानुसार सदर पदावर श्री.राठोड कायम राहिल्याने डॉ.इंगळे यांना हजर होता आले नाही. त्यामुळे डॉ.इंगळे हे दि.७/७/२०१० पासुन पदस्थापनेविना आहेत. डॉ.इंगळे यांचा सध्या परिविक्षा कालावधी चालु असुन परिविक्षा कालावधीमध्ये प्रशासकिय अडचणी उद्‌भवू नये म्हणुन श्री.एम.बी.इंगळे यांच्या

संदर्भ क्र.१ च्या बदली आदेशात सुधारणा करुन डॉ.एम.बी.इंगळे यांना **उपविभागीय कृषि अधिकारी, खामगांव, जि.बुलढाणा या रिक्त पदावर** सुधारित पदस्थापना देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

डॉ.इंगळे यांना शासन आदेश संदर्भ क्र.१ अन्वये बदलीने पदस्थापना दिलेले पद रिक्त नसल्याने त्यांना संदर्भिय बदली आदेशानुसार पूर्वीच्या दि.६/७/२०१० रोजी पदावरुन कार्यमुक्त झाल्यावर पदस्थापनेच्या पदी हजर होता आले नाही. त्यामुळे दि.७/७/२०१० पासुन आजतागायत त्यांना सुधारीत पदस्थापनेसाठी प्रतिक्षा करावी लागली. त्यामुळे त्यांचा पदस्थापनेविना व्यतित झालेला सदर प्रतिक्षा कालावधी म.ना.से. (वेतन) नियम १४ परिशिष्ट (एफ) नुसार **सक्तीचा प्रतिक्षा कालावधी** गृहीत धरुन कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्यास देखिल मान्यता देण्यात येत आहे. डॉ. इंगळे यांच्या संदर्भात संबंधित कार्यालयाने या आदेशानुसार त्यांच्या सक्तीच्या प्रतिक्षा कालावधीचे योग्य ती परिगणना करुन त्यांना नियमानुसार वेतन अदा करावे.

डॉ.एम.बी.इंगळे यांनी तात्काळ पदस्थापनेच्या पदावर हजर व्हावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

सही/-

**(संदीप ढाकणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया
सहसंचालक (आस्था.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
महालेखपाल (लेखा अनुज्ञे यता) (लेखा परीक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
विभागीय कृषि सह संचालक, अमरावती विभाग, अमरावती
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, बुलढाणा/यवतमाळ
यांना सूचीत करण्यात येते की, डॉ.इंगळे यांचा रुजू अहवाल तात्काळ शासनास सादर करावा.
प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, गोंदिया
जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा/गोंदिया {द्वारा, आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे}
डॉ.एम.बी.इंगळे,सहायक प्रकल्प अधिकारी, जि.ग्रा.वि.यं.गोंदिया {द्वारा, आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे}
निवड नस्ती

**प्रतिलिपी,**

मा.मंत्री (कृषि)/(फलोत्पादन)/ मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव